**श्री. अ. अ. सगणे यांना सचिव पदावर पदोन्नती देऊन सचिव (बांधकामे) या पदावर पदस्थापनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एपीपी-१११६/प्र.क्र.२८७/प्रशा-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: ०३ फेब्रुवारी, २०१७

<u>वाचा</u> :- सामान्य प्रशासन विभागाचे अर्ध शासकीय पत्र क्रमांक एईओ-१११७/१०/२०१७/दहा, दिनांक २१.०१.२०१७.

## शासन आदेश

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन अर्ध शासकीय पत्रान्वये श्री. अ. अ. सगणे, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांची पदोन्नतीने पदस्थापना सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई या पदावर करण्यात आलेली आहे. त्यानुसार श्री सगणे यांनी सचिव (बांधकामे) या पदाचा कार्यभार दि.२१.०१.२०१७ पासून स्वीकारला आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व शासन मान्यतेने श्री. अ. अ. सगणे यांच्या पदोन्नती बाबत पुढील सविस्तर आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

२. श्री. अ. अ. सगणे यांना वेतन बँड रु ३७४००-६७०००/- व ग्रेड वेतन रु.१०,०००/- या वेतन संरचनेत सचिव पदावर खालील अटींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती दि. २१.०१.२०१७ पासून देण्यात येत आहे. पदोन्नती नंतर त्यांची पदस्थापना सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई येथील सचिव (बांधकामे) या पदावर करण्यात येत आहे.

३. श्री. अ. अ. सगणे, (खुला प्रवर्ग) यांची ही तदर्थ पदोन्नती सचिव पदासाठी आस्थापना मंडळाच्या शिफारशीनुसार आहे. शासन मान्यतेनुसार त्यांची पदोन्नतीने पदस्थापना उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे, त्यांच्या पदोन्नतीवर परिणाम करण्याची शक्यता असलेल्या (Court cases or order having bearing on promotion) विविध न्यायालयात यासंदर्भात प्रलंबित असलेल्या सर्व याचिका / मूळ अर्ज / अवमान अर्ज अशा सर्व खालील न्यायालयीन प्रकरणांमधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

I. श्री. प्र.ग.गणवीर, मुख्य अभियंता यांनी मा उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेली याचिका क्रमांक ४४६६/२०१४.

II. मागासवर्ग कर्मचारी अधिकारी सुरक्षा महासंघ यांनी मा. उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेली याचिका क्र. १०१५९/२०१३.

III. श्री.अ.ना.शंभरकर, (सेवानिवृत्त मुख्य अभियंता) यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. ३/२०१४.

IV. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथील मूळ अर्ज क्रमांक १२८९/ २०१० यामध्ये दिनांक ११.०३.२०१५ रोजी दिलेल्या न्याय निर्णयाच्या विरुध्द शासनाच्या वतीने मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेली रिट याचिका क्रमांक ३८६५/२०१५.

V. मुख्य अभियंता (स्थापत्य) या संवर्गाची दिनांक १०.०८.१९९८ ते दिनांक ३१.१२.२०१४ या कालावधीची ज्येष्ठता सूची मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई येथे दाखल करण्यात आलेले मूळ अर्ज क्र.७३२/२०१४ व मूळ अर्ज क्र.५३/२०१५ च्या अधीन प्रसिध्द करण्यात आलेली आहे.

VI. मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेली रिट याचिका क्र.२७९७/२०१५ ( स्टॅम्प क्र. ७२५६/२०१५ ) (महाराष्ट्र राज्य वि. श्री विजय घोगरे व इतर ) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०३१७११००१४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sampat D Suryawanshi

Digitally signed by Sampat D Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=P W D, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2d0677dc3b9f523d6452edd479c3b2edc0887c9102b4130ae3ef3dd803b7322, cn=Sampat D Suryawanshi
Date: 2017.02.03 17:12:47 +05'30'

**(सं. द. सूर्यवंशी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून),यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

७. मा. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८. महालेखापाल १ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
९. महालेखापाल २ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,नागपूर,
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखाधिकारी, मुंबई,
१२. श्री. अ. अ. सगणे, सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. प्रधान सचिव (सा.बां.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. प्रधान सचिव (सेवा) , यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. सचिव (साविस) , यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. सचिव (बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१९. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
२०. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली-११० ००१,
२१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, (सर्व)
२२. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई,
२३. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. उप सचिव व कार्यासन अधिकारी (का.९/का.९ अ/का. १०/का.१३/का. १६ ब), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई,
२५. सर्व मंत्रालयीन विभाग,
२६. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
२७. सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२८. रोखशाखा (२ जादाप्रतीसह), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९. निवड नस्ती.